सार्वजनिक आरोग्य विभागाच्या अधिनस्त रुग्णालयांमध्ये लागणाऱ्या आगीच्या दुर्घटना टाळण्यासाठी करावयाच्या उपाययोजनांबाबत मार्गदर्शक सूचना.

महाराष्ट्र शासन

सार्वजनिक आरोग्य विभाग

शासन परिपत्रक क्रमांकः विसाक्ष- २०२१/ प्र.क्र.२९८/ आरोग्य-३

१० वा मजला, ए विंग ,गोकुळदास तेजपाल रूग्णालय संकुल इमारत,

लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई - ४०० ००१

दिनांक: १४ फेब्रुवारी, २०२२

वाचा -

१) आरोग्य सेवा संचालनालय, पत्र क्रमांक: आसेआ/कक्ष-३/रुग्णालयातील कामकाज/SOP/१९९६५-२०७४६/२०२१, दिनांक.२९.११.२०२१

शासन परिपत्रक-

संदर्भाधिन पत्रान्वये रुग्णालयातील कामकाज आणि अग्निसुरक्षा याकरिता मानक कार्यपद्धती निर्गमित करण्यात आली आहे. परंतु रुग्णालयांमध्ये वारंवार घडणाऱ्या आगीच्या घटना टाळण्यासाठी सार्वजनिक आरोग्य विभागाच्या अधिपत्याखालील सर्व रुग्णालयांमध्ये आगप्रतिबंधक उपाययोजनेसाठी खालीलप्रमाणे मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्याचे विचाराधीन आहे. सदर मार्गदर्शक सूचनांचे पालन करताना कुठलाही हलगर्जीपणा न करता, त्याचे काटेकोर पालन करणेची जबाबदारी रुग्णालय प्रशासनाची राहील. याबाबत पुढीलप्रमाणे मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात येत आहेत.

१. सर्व रुग्णालय परिसरात Fire Extinguisher बसवलेले असावे. ते कालबाहय होण्यापूर्वी नियमितपणे पुन्हा भरले जावे. तसेच सदर अग्नीशमन यंत्र बसवताना सदर यंत्राचा वापर करणेकरीता सहज काढता येणे शक्य होईल अशा जागी स्थापित करावी.

२. फायर सेफ्टी ऑडीट अन्वये प्राप्त त्रुटी अहवालानुसार रुग्णालयात अग्निशमन यंत्रे बसविण्यात यावीत.

३. सर्व कामगारांना दर तीन महिन्यांनी मॉक ड्रिलमध्ये अग्निशामक यंत्राचा वापर करण्याचे प्रशिक्षण देण्यात यावे. रुग्णालयातील सर्व दस्ताऐवज हे त्यांच्या छायाचित्रणासह जतन करुन ठेवण्यात यावे. मॉक ड्रिलसाठी स्थानिक अग्निशमन अधिकारी आणि आपत्ती व्यवस्थापन विभागातील अधिकाऱ्यांचा सहभाग असणे आवश्यक आहे.

४. सर्व अगिनशामक यंत्रे रिफीलिंग करुन घेण्यात यावे तसेच ते नेहमी भरलेल्या स्थितीत ठेवणे आवश्यक आहे. जास्त जोखीम असलेल्या भागात जास्तीत जास्त अग्निशामक यंत्रे लावण्यात यावे.

५. आग लागल्यास लिफ्टचा वापर करण्यात येऊ नये, अश्या ठळक सुचना लिफ्टच्या जवळ किंवा रुग्णालयाच्या दर्शनी भागात लावण्यात याव्यात.

६. अग्निशमन दलाची संख्या, प्रशिक्षित स्वयंसेवक, आपत्ती व्यवस्थापन कक्ष यांची माहिती रुग्णालयात दर्शनी भागात ठळकपणे प्रदर्शित करण्यात यावी.

७. प्रत्येक वॉर्डच्या Exit दरवाज्या समोर कोणतीही अडगळ असू नये, परिसर मोकळा असावा याची दक्षता घ्यावी.

८. रुग्णालयातील सर्व महत्वाच्या ठिकाणी आपत्कालीन निकासाची सुविधा असावी. ते बंद नसावीत याबाबत खात्री करावी तसेच अशा निर्गमणाचे पर्यायाबाबत त्याची माहिति ठळक अक्षरात लिहिलेली असणे आवश्यक आहे.

९. रुग्णालयात स्प्रिंकलर, फायर अलार्म आणि स्मोक डिटेक्टर त्वरित स्थापित करणेबाबत कार्यवाही वेगाने करावी. यासाठी सतत जिल्हा नियोजन व बांधकाम विभागास पाठपुरावा करावा.

१०. आय. सी.यु. मध्ये डॉक्टर व नर्सेस यांनी सतत उपस्थित असणे गरजेचे आहे.

११. जे रुग्ण हालचाल करु शकत नाहीत अशा रुग्णांकडे दुर्लक्ष होणार नाही याबाबत काळजी घ्यावी. असे रुग्ण ज्या ठिकाणी असतील जसे की, शस्त्रक्रिया पश्चात वॉर्ड किंवा अतिदक्षता विभाग, तेथे २४ x ७

अधिकारी/कर्मचारी यांचे कर्तव्ये सुनिश्चित करावे. तसेच बदली डॉक्टर/कर्मचारी आल्या शिवाय डॉक्टर आणि कर्मचाऱ्यांनी क्षेत्र सोडू नये. शक्य असल्यास अशा रुग्णांसह एक योग्य अटेंडंटला परवानगी दिली जाऊ शकते.

१२. CCTV फुटेज सतत चेक करावे. तसेच वेळोवेळी वेगवेगळया वेळी व दिवशी मॉकड्रिल करावेत.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आलेला असून त्याचा संकेताक २०२२०२१११३३३३०१२१७ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Roshani Dinesh Kadam Patil

Digitally signed by Roshani Dinesh Kadam Patil
DN: CN = Roshani Dinesh Kadam Patil, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Public Health Department
Date: 2022.02.14 11:26:52 +05'30'

**(रो.दि. कदम-पाटील)**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.

२. अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव (आरोग्य-१/वित्त/ नियोजन), मंत्रालय,मुंबई.

३. महालेखापाल, (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १- मुंबई/२- नागपूर.

४. आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.

५. संचालक-१, आरोग्य सेवा, मुंबई.

६. संचालक-२, आरोग्य सेवा, पुणे.

७. सहसंचालक आरोग्य सेवा, रुग्णालय (राज्यस्तर) मुंबई.

८. सहसंचालक आरोग्य सेवा प्रा.आ.केंद्र (जि.प.स्तर) मुंबई.

९. सर्व उपसंचालक, आरोग्य सेवा मंडळ.

१०. सर्व जिल्हा शल्य चिकित्सक.

११. सर्व जिल्हा आरोग्य अधिकारी.

१२. सर्व जिल्हा कोषागर अधिकारी

१३. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.

१४. निवासी लेखापरिक्षण अधिकारी,मुंबई.

१५. वित्त विभाग (कार्यासन- व्यय १३/ अर्थबळ), मंत्रालय, मुंबई.

१६. नियोजन विभाग (कार्यासन १४७२), मंत्रालय, मुंबई.

१७. निवडनस्ती (आरोग्य ३)